केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता आदिवासी (TSP) उपयोजनेंतर्गत सन २०१८-१९ मधील केंद्र हिश्श्यापोटी रू. ८३०.०० लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०६१८/प्र.क्र.३४७/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १ डिसेंबर, २०१८.

वाचा :-

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०३४/१३३/२०१८-NHM( Finance)८, दिनांक ३० जुलै, २०१८.

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. . G.२७०३४/१३३/२०१८-NHM( Finance)९, दिनांक ३० जुलै, २०१८.

३) केंद्र शासनाचे पत्र क्र. . G.२७०३४/१३३/२०१८-NHM( Finance)१२, दिनांक ३० जुलै, २०१८.

४) संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/ कें. रा.हि. /४२१४५-५२/२०१८-१९, दिनांक १० ऑगस्ट, २०१८.

५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१७/प्र.क्र.०५/कार्यासन-०६, दिनांक १९ ऑक्टोबर, २०१८.

प्रस्तावना :-

ग्रामिण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम,उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामिण आरोग्य अभियान सुरू केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive child Health), नियमित लसीकरण, मिशन फ्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलियो लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता आदिवासी

उपयोजनेंतर्गत (TSP) ६०% केंद्र हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता आदिवासी उपयोजनेंतर्गत (TSP) आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली प्रलंबित रु. ८३०.०० लक्ष (रुपये आठशे तीस लक्ष फक्त) इतकी रक्कम ६०% केंद्र हिश्श्यापोटी सन २०१८-१९ या वर्षाकरीता राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद केलेल्या योजना निहाय ६०% केंद्र हिश्श्यापोटी नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

(रु. लाखात)

| केंद्र हिस्सा तपशिल | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद (मुळ व पुरक मागणी) | वितरीत (केंद्र हिस्सा ६०%) |
|---|---|---|---|
| टी-५, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा- विषमचिकित्सा, ७९६- जनजाती क्षेत्र | २२१०F७३८ | १३४२३.०६ | ८३०.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| उपयोजना, (०१)जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा) ६० टक्के, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) | | | |

४. वित्त विभागाच्या दिनांक ०२ एप्रिल, २०१८ सोबतच्या परिशिष्टामधील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरिल निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४३३/अर्थोपाय, दिनांक २४ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२९१६४०५१४२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.12.01 10:47:55 +05'30'

(सु. अ. पेडगांवकर)
अवर सचिव, महाराष्ट शासन

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती ( आरोग्य -७) .